सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात सातारा सैनिक शाळेला योजनेतर (वेतनेतर) अनुदानासाठी निधी वितरणास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सासैशा-२०१८/प्र.क्र.१७७/एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ३२
तारीख: १३ फेब्रुवारी, २०१९

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.४.२०१७
२) शासन परिपत्रक क्रमांकः पूरक २०१६/प्र.क्र.९९/ अर्थसंकल्प-३ , वित्त विभाग, दिनांक ३०.६.२०१७
३) शासन निर्णय क्रमांक सासैशा-२०१७/प्र.क्र.१७३/एसएम-६, शालेय शिक्षण विभाग, दिनांक २८.०३.२०१८
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे यांचे क्र. सासैशा/अनुदाने/२०१८- १९/माध्य-ब/३०३ ०३/११०४, दिनांक १४.१२.२०१८

**प्रस्तावना :-**

सातारा सैनिकी शाळेची स्थापना दि. २३ जून १९६१ रोजी झाली असून सदर शाळा ही देशातील पहिली सैनिकी शाळा आहे. महाराष्ट्रातील तळागळातील व सर्व स्तरावरील गरीब व होतकरू मुलांना राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीच्या माध्यमातून भारतातून सैन्य दलात अधिकारी पदावर संधी मिळावी, हा या शाळेचा मुख्य उद्देश आहे. या शाळेतून मोठया प्रमाणावर विद्यार्थी राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीमध्ये आतापर्यंत भरती झाले आहेत.

सातारा सैनिक शाळेला प्रतिवर्षी इमारत देखभाल, आहारभत्ता, घोडा देखभाल, जाहिरात खर्च, नगरपालिका कर या प्रयोजनार्थ योजनेतर (वेतनेतर) अनुदान मंजूर करण्यात येते. सैनिक स्कूल सोसायटी व राज्य शासन यांच्यामध्ये सातारा सैनिक शाळेसंदर्भात ३० डिसेंबर,२०१६ रोजी सामंजस्य करार करण्यात आला आहे. त्यानुसार शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),पुणे यांनी प्रशिक्षण व प्रशासकीय खर्च या प्रयोजनार्थ सातारा सैनिकी शाळेचे रु. १,१७,१४०००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक दिनांक १४.१२.२०१८ च्या पत्रान्वये शासनास सादर केले आहे. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता सातारा सैनिक शाळेला प्रशिक्षण व प्रशासकीय खर्च या प्रयोजनार्थ मागणी केलेला रु. १,१७,१४,०००/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रु. ६,६३,४८,०००/-इतकी अर्थसंकल्पीय तरतूद असून त्यापैकी रु. १,३१,९२,४४२/- इतका निधी दि. ६.१२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे. उपलब्ध तरतूदीतून खालील बाबीकरिता मागणी केलेल्या रु. १,१७,१४,०००/- निधीपैकी ७०% म्हणजेच रु. ८१,९९,८०० /-(रुपये ऐक्याऐंशी लाख नव्याण्णव हजार आठशे फक्त) इतका निधी सातारा सैनिकी शाळेला खालील बाबींवरील खर्चासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | खर्चाची बाब | सन २०१८-१९ मध्ये मागणी केलेला निधी (रुपये) | मागणी केलेल्या निधीच्या ७०% वितरीत करावयाचा निधी (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | प्रशिक्षण व व्यवस्थापकीय खर्च | १,१७,१४,००० | ८१,९९,८०० |
| | **एकूण** | **१,१७,१४,०००** | **८१,९९,८००** |

२. सदर खर्च “मागणी क्रमांक ई-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण-११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (०३) पूर्वाध्ययन सैनिकी शाळांना सहायक अनुदान (२२०२०४६९), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)”या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून तसेच सहायक संचालक (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.४.२०१७ व क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र. ९४/अर्थ-३, दिनांक ३०.६.२०१७ च्या परिपत्रकातील आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. (४) येथील शासन परिपत्रक, दिनांक ३०.६.२०१७ व शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दिनांक २१.२.२०१८ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१३१७३७०५४८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2019.02.13 17:39:24 +05'30'

**( स्वाती म. नानल )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण )मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
३. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे
६. शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, सातारा.
७. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
८. प्रधान महालेखापाल(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
१०.वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
११.प्राचार्य, सैनिकी स्कूल, सातारा
१२.सचिव, संरक्षण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
१३.मानद सचिव, बोर्ड ऑफ गव्हर्नस सैनिकी स्कूल, नवी दिल्ली.
१४.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.वित्त विभाग,व्यय-५/अर्थसंकल्प-३ मंत्रालय,मुंबई-३२
१६.**निवड नस्ती (एसएम-6)**